महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ,
मर्यादित, मुंबई........
सन २००२ - २००३ या आर्थिक वर्षाकरीता
महामंडळास भागभांडवली अंशदान मंजूर
करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक : अविम - २००२ / प्र.क्र. ३१७/ सुधार -३,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ३२
दिनांक : २५ मार्च, २००३

**वाचा :-** १) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ (म.), मुंबई यांचे पत्र क्रमांक : अविविम/ प्र.क्र. ६१/ २००२/ ६६, दिनांक १७/१०/२००२

२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ (म.), मुंबई यांचे पत्र क्रमाक : अविविम/ प्र.क्र. ६१/ २००२, दिनांक ११ डिसेंबर, २००२

३) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य क्रिडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : इडीडी २००१ / प्र.क्र, ६५/ सुधार - ३, दिनांक २१ नोव्हेंबर, २००१

**शासन निर्णय :-** अपंगाच्या सामाजिक विकासासाठी शासनाने शासन निर्णय क्रमांक : इडीडी - २००१/ प्र.क्र. ६५/ सुधार - ३, दिनांक २१ नोव्हेंबर, २००१ अन्वये महाराष्ट्र राज्य, अपंग वित्त व विकास महामंडळाची स्थापना केलेली आहे. या महामंडळाचे अधिकृत भाग भांडवल रु. ५० कोटी एवढे आहे. या महामंडळास सन २००२ - २००३ चे भाग भांडवल मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यास अनुसरुन शासन या आदेशान्वये खालील बाबीवरील खर्च भागविण्याकरीता रक्कम रु. २७ . १० लाख ( रुपये सत्तावीस लाख दहा हजार) एवढे शासकीय भाग भांडवल मंजूर करीत आहे.

अ) महामंडळास राष्ट्रीय विकलांग वित्त व विकास महामंडळाची कर्ज प्रकरणे करण्याकरीता रु. २४, ६०,००० /- एवढी रक्कम मंजूर करण्यात येत आहे.

ब) महामंडळास जिल्हा स्तरावर योजना राबविण्याकरीता नियुक्त करण्यात यावयाच्या / आलेल्या एजन्सीच्या सेवाशुल्कावरील खर्च भागविण्याकरीता, खालील अटीस अधिन राहून, रक्कम रु. २, ५०,००० /- एवढी एक महिन्याकरीता म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

१) याबाबत महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळाचे अधिकार स्पष्ट करणे.
२) या योजने अंतर्गत वसुलीबाबतची प्रक्रीया / कार्यवाही संदर्भातील तरतूदी स्पष्ट करणे.

२. हा खर्च लेखाशिर्ष " ४२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण यावरील भांडवली खर्च -०२ समाज कल्याण- १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूक ( ०२) पंचवार्षिक

(कृ.मा.प.)

योजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०१) अपंगासाठी असलेल्या महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान ( ४२३५ ०१८२ ) मागणी क्रमांक : एन - १० ए" या खालील तरतुदीतून भागविण्यात येईल.

३. यासाठी आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. विभागीय समाजकल्याण अधिकारी, मुंबई विभाग मुंबई यांना यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे याबाबतच्या देयकावर त्याना अथवा त्यांनी घोषित केलेल्या दुय्यम अधिका-यास स्वाक्षरी करण्याचे प्राधिकार देण्यात येत आहेत.

५. हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या संहमतीने वित्त विभाग अनौ. संदर्भ क्रमांक : ७६/ सा.ऊ. दिनांक १०/२/२००३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावने,

(सु.व.चव्हाण)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ, मुंबई.
विभागीय समाज कल्याण अधिकारी, मुंबई विभाग, मुंब..
महालेखापाल, महाराष्ट्र - १ ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई. / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
वित्त विभाग, (सा.ऊ.), मंत्रालय, मुंबई -३२
निवड नस्ती कार्यासन सुधार -३

**जिल्हाकोषाधिकारी, ठाणे**
**उप कोषाधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई.**